**सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षामध्ये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याकरिता संस्था/शाळांची निवड करण्याबाबत.**

**अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नानिशा-२०१८/प्र.क्र.२१/का.१२**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० ऑगस्ट, २०१८.

**वाचा :**

१. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का.१३, दि.२८.०८.२००९
२. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.नानिशा-२०१५/प्र.क्र.३८७/का-१२, दि.२७.०६.२०१६.
३. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.नानिशा-२०१६/प्र.क्र.२८०/का.१२, दि.२९.०५.२०१७.
४. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र. नानिशा-२०१८/प्र.क्र.२१/का.१२, दि.१८.०५.२०१८.
५. शासन पत्र क्र.नानिशा-२०१८/प्र.क्र.२१/का-१२, दि.११.०६.२०१८.
६. नामांकित निवासी शाळा निवडीकरिता दि.२७.०७.२०१८ रोजी झालेली बैठक.

**प्रस्तावना :**

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबतची योजना संदर्भ क्र. १ येथील दि.२८.०८.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात राबविण्यात येत आहे. सदर योजना अंमलबजावणीमध्ये सुसूत्रता आणण्याकरिता शाळेमध्ये उपलब्ध शैक्षणिक व निवासी सोयी सुविधा आणि त्याच्या दर्जानुसार गुणांकन निश्चित करून प्राप्त गुणांकनानुसार शाळांची निवड करणे व शाळांना द्यावयाचे शुल्क निर्धारीत करण्याकरिता संदर्भ क्र. २ येथील दि.२७.०६.२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार धोरण ठरविण्यात आलेले आहे. तसेच सदर योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण घेत असलेल्या इतर विद्यार्थ्यांसमवेत योजनेंतर्गत प्रवेशित अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांची शैक्षणिक प्रगती अधिक चांगली होण्याच्या सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षापासून दृष्टीने इयत्ता १ ली व इयत्ता २ री या सुरूवातीच्या टप्प्यामध्येच प्रवेश देण्याबाबत संदर्भ क्र. ३ येथील दि.२९.०५.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच शाळेमध्ये उपलब्ध शैक्षणिक व निवासी सोयी सुविधा आणि त्याच्या दर्जानुसार गुणांकन निश्चित करून प्राप्त गुणांकनानुसार शाळांची निवड करणे याबाबत संदर्भ क्र. ४ येथील दि. १८.०५.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारीत धोरण ठरविण्यात आलेले आहे.

उपरोक्त तरतूदीस अनुसरून नामांकित योजनेंतर्गत चालू शैक्षणिक वर्ष सन २०१८-१९ करिता अनुसूचित जमातीचे विद्यार्थी प्रवेशित करण्याच्या अनुषंगाने योजनेकरिता विकसित करण्यात आलेल्या ऑनलाईन प्रणालीमार्फत (https://namankit.mahaonline.gov.in) प्राप्त नवीन शाळांचे अर्ज तसेच

सदर योजनेंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या जुन्या शाळांमार्फत प्राप्त संमतीपत्र यास अनुसरून संबंधित प्रकल्प अधिकारी व अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी शासनास प्रस्ताव सादर केले आहेत. सदर प्रस्तावाबाबत सचिव स्तरीय समितीमध्ये प्राप्त मान्यतेस अनुसरून नामांकित योजनेंतर्गत संस्था/शाळांची निवड करणे व अशा शाळांमध्ये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्रवेशित करण्यास मंजूरी देण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :**

सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षाकरिता अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण देणे या योजनेंतर्गत विहित निकष पूर्ण करीत असलेल्या अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या कार्यक्षेत्रातील खालीलप्रमाणे नमूद केलेल्या संस्था/ शाळांची निवड करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच विहित अटी व शर्तींच्या अधिन राहून सदर शाळांमध्ये मंजूर करण्यात येत असलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत अनुसूचित जमातीचे विद्यार्थी प्रवेशित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. नामांकित योजनेंतर्गत सन २०१८-१९ या चालू शैक्षणिक वर्षाकरीता ऑनलाईन प्रणालीमार्फत सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून सन २०१८-१९ या चालू शैक्षणिक वर्षामध्ये नवीन विद्यार्थी प्रवेशित करण्यास खालील नवीन शाळांची निवड (Approved) करण्यात येत असून संबंधित शाळेसमोर दर्शविलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत अनुसूचित जमातीचे नवीन विद्यार्थी प्रवेशित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | शाळेचे नाव व पत्ता | प्रवेशित करावयाची विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|
| १ | जगदंबा एज्यूकेशन सोसायटी, येवला, जि. नाशिक | एस.एन.डी. इंग्लिश मेडीयम पब्लिक स्कुल (C.B.S.E.), बाभुळगांव, ता.येवला, जि.नाशिक. | १०० |
| | | **एकूण** | **१००** |

३. सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षाकरिता शासन निर्णय दि.१८.०५.२०१८ चे निकष पूर्ण करणाऱ्या जुन्या नामांकित शाळांची निवड (Approved) करण्यात येत असून संबंधित शाळेसमोर दर्शविलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत अनुसूचित जमातीचे नवीन विद्यार्थी प्रवेशित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच विश्वात्मक जंगली महाराज संस्थेच्या शाळांमध्ये विद्यार्थ्यांना शिक्षणा बरोबरच सुसंस्कार व चारीत्र्य संपन्नता याबाबत शिक्षण देत असल्याने त्या शाळांमध्ये योजनेंतर्गतच्या अनुसूचित जमातीच्या ५० टक्के विद्यार्थ्यांची मर्यादा शिथिल करण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | शाळेचे नाव व पत्ता | प्रवेशित करावयाची विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|
| १ | प्रवरा ग्रामिण शिक्षण संस्था, प्रवरानगर मु.पो.लोणी ता.राहता, जि. अहमदनगर. | प्रवरा पब्लिक स्कूल प्रवरानगर ता.राहता, जि. अहमदनगर. | १०० |

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | शाळेचे नाव व पत्ता | प्रवेशित करावयाची विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|
| २ | प्रवरा ग्रामिण शिक्षण संस्था, प्रवरानगर, मु.पो.लोणी, ता.राहता, जि.अहमदनगर. | प्रवरा गर्ल्स इंग्लीश मिडीयम स्कूल मु.पो.लोणी, ता.राहता, जि.अहमदनगर. | १५० |
| ३ | आंतरभारती रुरल इंटरनॅशनल संस्था विरगाव, ता.अकोले, जि.अह.नगर. | धर्मवीर आनंदराव दिघे, इंग्लिश मेडीयम स्कुल, विरगांव, ता.अकोले, जि.अ.नगर. | १०० |
| ४ | प्रसाद ग्रामिण शिक्षण संस्था, गणेगांव पो. गुहा, ता. राहुरी, जि. अ.नगर. | श्री. बाळासाहेब वाणी सेंट्रल स्कूल, गणेगांव पो.गुहा, ता.राहूरी, जि.अ.नगर. | ५० |
| ५ | एन.एफ.ई. मिशन इंडिया मिशन हाऊस चोपडा, जि.जळगाव. | मिमोंसा इंग्लिश मिडियम स्कुल चोपडा ता.चोपडा, जि.जळगाव. | ४० |
| ६ | अमर संस्था चोपडा, जि.जळगांव | लिटील हार्ट इंग्लिश मेडीयम स्कूल, वेले, ता.चोपडा, जि.जळगांव. | ५० |
| ७ | आर.पी. गोडगे पाटील ग्रामिण बहुउद्देशिय शिक्षण प्रसारक संस्था चिंचोली गुरव ता.संगमनेर जि.अ.नगर | आर. पी . गोडगे पाटील इंग्लिश मिडियम स्कुल, वावी, ता.सिन्नर. | १०० |
| ८ | कै. तुळशिराम सखाराम हिरे शिक्षण संस्था, दाभाडी, ता.मालेगाव, जि.नाशिक. | जयहींद इग्लिश मेडीयम स्कूल, दाभाडी, ता.मालेगाव, जि.नाशिक. | ५० |
| ९ | विश्वात्मक जंगली महाराज आश्रम ट्रस्ट, कोकमठाण, ता.कोपरगाव, जि.अहमदनगर. | ओम गुरुदेव इंग्लिश मिडियम स्कुल, कोकमठाण ता. कोपरगाव, जि. अहमदनगर. | १५० |
| १० | श्री. बबनराव पाचपूते विचारधारा ट्रस्ट, काष्टी ता. श्रीगोंदा, जि.अहमदनगर. | परिक्रमा पब्लिक स्कुल, काष्टी, ता.श्रीगोंदा जि.अहमदनगर. | १०० |
| ११ | विश्वात्मक जंगली महाराज आश्रम ट्रस्ट कोकमठाण, ता.कोपरगाव, जि.अहमदनगर | आत्मा मालिक इंग्लिश मिडियम गुरुकुल, पुरणगाव, ता.येवला, जि.नाशिक. | १०० |
| | | **एकूण** | **९९०** |

४. नामांकित योजनेंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या जुन्या शाळांकडून ऑनलाईन प्रणालीमार्फत सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून सन २०१८-१९ या चालू शैक्षणिक वर्षामध्ये गुणांकनानुसार पात्र ठरलेल्या खालील शाळांमध्ये नवीन विद्यार्थी प्रवेशित न करण्याबाबत निर्णय घेण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | शाळेचे नाव व पत्ता |
|---|---|---|
| १ | अमृतवाहीनी शेती व विकास संस्था संगमनेर, जि. अहमदनगर. | अमृतवाहीनी मॉडेल स्कुल संगमनेर, ता.संगमनेर, जि.अहमदनगर. |
| २ | फाऊंडेशन फॅार रुरल इंटीग्रेशन एज्यूकेशन अॅन्ड डेव्ह. सर्व्हिसेस, मुंबई. | रामराव आदिक पब्लीक स्कूल, निपाणी वडगाव ता.श्रीरामपूर, जि.अहमदनगर. |
| ३ | अभिनव शिक्षण संस्था नवलेवाडी, ता.अकोले, जि. अहमदनगर | श्री.मारुतीराव कोते अभिनव पब्लिक इग्लींश मिडीयम स्कुल, ता.अकोले, जि.अहमदनगर. |
| ४ | सूलोचना बेल्हेकर सामाजिक व शैक्षणिक संस्था, भानसहिवरे, ता.नेवासा, जि.अहमदनगर. | ज्ञानेश्वर इंटरनॅशनल स्कुल भानसहिवरे, ता.नेवासा, जि. अहमदनगर. |
| ५ | सूलोचना बेल्हेकर सामाजिक व शैक्षणिक संस्था, भानसहिवरे, ता.नेवासा, जि.अहमदनगर. | ज्ञानेश्वर प्रायमरी स्कुल भानसहिवरे, ता.नेवासा, जि.अहमदनगर. |
| ६ | त्रिमुर्ती पावन प्रतिष्ठान नेवासा, ता.नेवासा, जि.अहमदनगर. | त्रिमुर्ती पब्लीक स्कुल, नेवासा ता.नेवासा, जि.अहमदनगर. |
| ७ | त्रिमुर्ती पावन प्रतिष्ठान नेवासा, ता.नेवासा, जि.अहमदनगर. | त्रिमुर्ती पब्लीक स्कुल, शेवगाव ता.शेवगाव जि.अहमदनगर. |
| ८ | दि पुर्णा झिजस स्कूल सोसायटी श्रीरामपूर, जि.अहमदनगर. | सेंन्ट झेवियर्स पब्लिक स्कुल, श्रीरामपूर, जि.अहमदनगर. |
| ९ | विवेकानंद प्रतिष्ठाण जळगाव, जि.जळगाव. | विवेकानंद प्रतिष्ठाण इंग्लिश मिडियम स्कुल संभाजीनगर,जळगाव, ता.जि.जळगाव. |
| १० | प्रोग्रेसिव्ह रुरल इंस्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी शिरपूर, जि. धुळे | सदाशिव शेठ आर बाविस्कर इंटरनॅशनल स्कुल, दहिवद ता. शिरपूर, जि. धुळे. |
| ११ | जगदंबा एज्यूकेशन सोसायटी, येवला, जि. नाशिक | एस.एन.डी. इंग्लिश मेडीयम पब्लिक स्कुल (S.S.C.), बाभुळगांव, ता.येवला, जि.नाशिक. |
| १२ | सेंन्ट्रल हिंदू मिलीटरी एज्यूकेशन सोसायटी, नाशिक | भोसला मिलिटरी बॉइज स्कूल, नाशिक. |
| १३ | सेंन्ट्रल हिंदू मिलीटरी एज्यूकेशन सोसायटी, नाशिक | भोसला मिलिटरी गर्ल्स स्कुल, नाशिक. |
| १४ | सुर्वाता अलायन्स मिनिस्ट्रीज ट्रस्ट नंदुरबार, जि. नंदुरबार | एस. ए. मिशन इंग्लिश मेडीयम स्कुल, तळोदा रोड, नंदुरबार. |

५. नामांकित योजनेंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या जुन्या शाळांकडून ऑनलाईन प्रणालीमार्फत सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून सन २०१८-१९ या चालू शैक्षणिक वर्षामध्ये गुणांकनानुसार अपात्र ठरलेल्या खालील शाळांमध्ये नवीन विद्यार्थी प्रवेशित न करण्याबाबत निर्णय घेण्यात येत आहे. तथापि, दि.१८.०५.२०१८ चे अन्य निकष १ वर्षात पूर्ण करण्याच्या अधिन राहून सदर शाळांमध्ये यापूर्वी प्रवेशित असलेले विद्यार्थ्यांचे प्रवेश कायम ठेवण्यात (Continue) यावेत.

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | शाळेचे नाव व पत्ता |
|---|---|---|
| १ | अरुणोदय बहुउद्देशिय ग्रामीण विकास संस्था, श्रध्दा कल्पना पॅलेस, गणेशवाडी | केदारेश्वर इंग्लिश मिडीयम स्कूल, नजीक बाभुळगाव ता. शेवगाव जि. अहमदनगर |
| २ | स्व. भाऊ दाजी पाटील देशमूख ग्रामीण विकास प्रतिष्ठान, कोतूळ ता. अकोले जि.अहमदनगर. | कोतूळ पब्लिक स्कूल, कोतूळ ता. अकोले, जि.अहमदनगर |
| ३ | संस्कार प्रतिष्ठान राळेगणसिध्दी ता.पारनेर जि. अहमदनगर | कै. दादाभाऊ भागुजी मापारी इंग्लिश मिडीयम स्कूल, राळेगणसिध्दी ता. पारनेर जि. अहमदनगर |
| ४ | कै. मातोश्री भागीरथी सिताराम निघुते मेमोरियल फाऊंडेशन, संगमनेर, जि.अहमदगनर. | लोटस इंग्लिश मिडियम स्कूल, वडगावपान, ता.संगमनेर जि. अहमदनगर. |
| ५ | शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ राहुरी, जि.अहमदनगर. | शिवाजी विद्यानिकेतन राहुरी जि. अहमदनगर. |
| ६ | धन्वंतरी मेडीकल अँड एज्यूकेशन फाऊंडेशन अहमदनगर | आयझॅक पब्लीक स्कूल भाळवणी,ता. पारनेर, जि.अहमदनगर |
| ७ | त्रिमुर्ती पावन प्रतिष्ठान नेवासा ता. नेवासा, जि. अहमदनगर | त्रिमुर्ती पब्लिक स्कूल, ढोर जळगांव ता. शेवगाव जि. अहमदनगर |
| ८ | महात्मा फुले सामाजिक व शैक्षणिक विकास मंडळ चाळीसगांव जि. जळगाव | हॅरिसन पब्लिक स्कूल, चाळीसगाव, जि. जळगाव |
| ९ | गॉड स्मिथ चॅरीटेबल ट्रस्ट किनगांव ता. यावल, जि. जळगांव | इंग्लिश मिडीयम निवासी पब्लीक स्कूल किनगांव डोणगांव रोड, ता. यावल, जि. जळगांव |
| १० | सरस्वती विद्या प्रसारक मंडळ सतखेडा ता. एरंडोल जि. जळगांव | आयडीयल इंग्लिश मिडीयम स्कूल, जळगांव, जि.जळगांव |
| ११ | ओंकारेश्वर बहुउद्देशिय संस्था विटनेर ता. चोपडा, जि. जळगाव | लिटील व्हॅली प्री-प्रायमरी व बालविश्व प्रायमरी स्कूल कासोदा, ता. एरंडोल, जि. जळगांव |
| १२ | सत्यशोधक महात्मा फुले शिक्षण संस्था, मालपुर, ता. शिंदखेडा जि. धुळे | सुरेशचंद्र बी. संघवी इंटरनॅशनल स्कूल, उन्नाण, ता. एरंडोल, जि. जळगाव |
| १३ | श्री. ह.भ.प. शंकरबुवा चौधरी शैक्षणिक संस्था, चिमठाणे ता. शिंदखेडा. जि. धुळे | सुरुची प्रायमरी इंग्लिश मिडियम स्कूल, चिमठाणे, ता. शिंदखेडा, जि. धुळे |
| १४ | हिंदुस्थानी स्पोर्टस ॲण्ड ज्यूडो कराटे असोसिएशन पिंपळनेर ता. साक्री, जि. धुळे | राजे छत्रपती मार्शल आर्ट इंग्लिश मिडियम पब्लिक स्कूल, पिंपळनेर, ता. साक्री, जि. धुळे |
| १५ | श्री. स्वामी स्वयंसेवाभावी संस्था, गणेशपूर ता. साक्री, जि. धुळे | सरस्वती इंग्लिश मिडीयम स्कूल, गणेशपूर, ता.साक्री, जि. धुळे |
| १६ | कै. क. यु. हिरे शिक्षण प्रसारक मंडळ दाभाडी ता. मालेगाव जि. नाशिक | आदर्श इंग्लिश मिडीयम स्कूल, काकडगांव नामपूर, मालेगाव रोड, ता. सटाणा, जि. नाशिक |
| १७ | ज्ञानदा शैक्षणिक सामाजिक संस्था वडेल ता. मालेगाव जि. नाशिक | स्वामी विवेकानंद स्कूल फॉर एक्सलंस अंजग ता. मालेगाव, जि. नाशिक |

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | शाळेचे नाव व पत्ता |
|---|---|---|
| १८ | आदिवासी देवमोगरा एज्यू. सोसायटी नटावद, ता.जि. नंदूरबार | के.डी. गावीत निवासी इंग्रजी माध्यमाची शाळा पथराई शिवार, नंदूरबार, ता.जि. नंदुरबार |
| १९ | सरदार पटेल शिक्षण प्रसारक मंडळ, नंदूरबार, ता.जि. नंदूरबार | कै. एल.एम. पटेल इंग्लिश मिडीयम स्कूल पातोंडा ता. जि. नंदूरबार |
| २० | विद्यासहयोग बहुउद्देशिय संस्था तळोदा जि. नंदूरबार | विद्या गौरव प्रा. इंग्लिश मिडीयम स्कूल, तळोदा |
| २१ | सुवार्ता अलायन्स मिनीस्ट्रीज ट्रस्ट, नंदुरबार. | एस.ए.मिशन इंग्लिश मेडीयम स्कूल, शहादा, जि.नंदुरबार. |

**६. नामांकित शाळेत प्रवेश देताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे :-**

I. संबंधित संस्था/शाळा मार्फत शासनाला सादर केलेल्या प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे सर्व सोयी सुविधा देण्यास तयार आहेत, याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी खातरजमा करावी व संस्थेकडून तसे हमीपत्र घ्यावे.

II. संस्था/शाळेमार्फत आदिवासी विद्यार्थ्यांसाठी वेगळी तुकडी/वर्ग सुरु करणे अपेक्षित नाही, शाळेमध्ये सुरु असलेल्या नियमित तुकडी/वर्गामध्येच इतर विद्यार्थ्यांसमवेत योजनेंतर्गत प्रवेशित अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिक्षण देणे बंधनकारक राहील. असे आढळल्यास सदर शाळेची मान्यता तात्काळ रद्द करण्यात येईल.

III. सदर योजनेंतर्गत शासनाने मान्यता दिलेल्या शाळांमध्येच आणि संबंधित शाळेकरिता मंजूर केलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेतच अनुसूचित जमातीचे विद्यार्थी प्रवेशित करण्याबाबत अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी दक्षता घ्यावी.

IV. योजनेच्या मूळ तरतूदीनुसार कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रू. १ लाख एवढ्या कमाल मर्यादेत असणाऱ्या पाल्यांनाच सदर योजनेचा लाभ देण्यात यावा.

V. प्रकल्प अधिकारी यांनी विद्यार्थी प्रवेशित करताना जवळच्या शाळेमध्ये तसेच संबंधित प्रकल्पातील निवड करण्यात आलेल्या शाळांना प्राधान्य देऊन विद्यार्थी प्रवेशाची प्रक्रिया तात्काळ पूर्ण करावी.

VI. एखाद्या प्रकल्प कार्यक्षेत्रातील निवड करण्यात आलेल्या शाळा व त्यामध्ये मंजूर विद्यार्थी संख्या यापेक्षा योजनेंतर्गत प्रवेशाकरिता प्राप्त अर्जाची संख्या जास्त असल्यास जवळच्या प्रकल्पामधील निवड करण्यात आलेल्या शाळेमध्ये विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात यावा तथापि, असे करत असताना अपर आयुक्त, आदिवासी विकास यांच्या कार्यक्षेत्राबाहेरील प्रकल्पातील विद्यार्थी प्रवेशित होणार नाहीत याची खातरजमा करावी. याबाबतचे पर्यवेक्षण अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावे.

VII. सदर योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांच्या संस्थाचालक/मुख्याध्यापका यांच्या समवेत अपर आयुक्त यांनी शैक्षणिक वर्षाच्या प्रथम व द्वितीय सत्रामध्ये बैठक घेऊन प्रवेशित विद्यार्थ्यांची शैक्षणिक प्रगती व त्यांना पुरविण्यात येणाऱ्या सुविधांबाबत आढावा घ्यावा.

VIII. नामांकित योजनेंतर्गत शाळेची निवड झाल्यानंतर पहिल्या सत्रात तसेच द्वितीय सत्रात संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी नामांकित शाळांना व्यक्तीश: भेट देऊन त्याबाबतचा अहवाल अपर आयुक्त, आदिवासी विकास; आयुक्त, आदिवासी विकास यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

IX. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का.१३, दि.२८.०८.२००९; आदिवासी विकास विभाग, आणि आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र नानिशा-२०१८/प्र.क्र.२१/का-१२, दि.१८.०५.२०१८ मधील विहित तरतूदींचे काटेकोरपणे पालन करावे. सदर तरतूदींचे पालन न करणाऱ्या शाळांची मान्यता सन २०१९-२० मध्ये रद्द करण्यात येईल.

X. सन २०१८-१९ या चालू शैक्षणिक वर्षापासून योजनेंतर्गत नवीन विद्यार्थ्यांना इयत्ता १ ली व इयत्ता २ री या सुरूवातीच्या टप्प्यामध्येच प्रवेश देण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

XI. सदर शासन निर्णयानुसार नामांकित योजनेंतर्गत मान्यता रद्द करण्यात आलेल्या शाळांमधील विद्यार्थी तसेच शासकीय इंग्रजी माध्यमाच्या श्रेणीवाढ नसलेल्या शाळांमधील विद्यार्थ्यांना इतरत्र समायोजित करण्यात यावे. असे समायोजन करताना विभागाच्या एकलव्य मॉडेल रेसिडेन्शियल शाळा तसेच इंग्रजी माध्यमाच्या शासकीय आश्रमशाळांमध्ये रिक्त असलेल्या जागांवर प्रथम प्राध्यानाने प्रवेश देण्याबाबत कार्यवाही करावी. तद्नंतर सदर शासन निर्णयान्वये मान्यता दिलेल्या इतर नामांकित शाळांमध्ये मंजूर विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत अशा विद्यार्थ्यांचे समायोजन करण्यात यावे. तसेच सदर शासन निर्णयान्वये मंजूर नामांकित शाळांमध्ये मंजूर विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत समायोजन करणे शक्य नसल्यास याव्यतिरिक्त समायोजनाच्या प्रस्तावास शासनाची मान्यता घेण्यात यावी.

XII. नामांकित योजनेंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या नामांकित शाळेमध्ये विद्यार्थी प्रवेशित करताना ज्या इयत्तेत विद्यार्थी प्रवेशित करावयाचे आहेत, अशा इयत्तेत संबंधित शाळेमध्ये नामांकित योजनेव्यतिरिक्त प्रवेशित इतर विद्यार्थी (Non-namankit students) संख्येच्या समप्रमाणाच्या कमाल मर्यादेत राहतील याची दक्षता घेण्यात यावी. (नामांकित योजनेंतर्गत प्रवेशित विद्यार्थी कमाल ५० टक्के : योजनेव्यतिरिक्त प्रवेशित इतर विद्यार्थी किमान ५० टक्के)

७. ज्या नामांकित संस्थेत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांस प्रवेश देण्यात येणार आहे, त्या संस्थेबरोबर संबंधित प्रकल्प अधिकाऱ्यांनी करारनामा करावा. सदर करारामध्ये नामांकित योजनेंतर्गत अनुसचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात आलेल्या वर्गापासून इयत्ता १२ वी पर्यंत त्यांचे शिक्षण, आरोग्य, सुरक्षा, निवास, आहार व अन्य विहीत सोयी सुविधा पुरविण्याबाबत बाबींचा समावेश करण्यात यावा. तसेच नामांकित योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या सर्व नामांकित शाळांचे प्रत्येक वर्षी नवीन शैक्षणिक वर्ष सुरू होण्यापूर्वी योजनेकरिता विकसित करण्यात आलेल्या ऑनलाईन प्रणालीवर गुणांकन करण्यात येईल व आवश्यक विहीत शैक्षणिक व निवासी सोयी सुविधा यामध्ये निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांमध्ये त्रुटी आढळून आल्यास किंवा विहीत गुणांकनानुसार शाळा अपात्र ठरल्यास संबंधित शाळेची नामांकित योजनेंतर्गतची मान्यता रद्द करून प्रवेशित करण्यात आलेले अनुसूचित जमातीचे विद्यार्थी इतरत्र समायोजित करण्यात येतील, याचा देखील करारनाम्यात समावेश असावा.

नामांकित योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शाळांमार्फत बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार, अधिनियम, २००९ व त्याअंतर्गत केलेले व केले जाणारे सर्व नियमांची / तरतूदींची तसेच इयत्ता १ ली मध्ये शाळा प्रवेशासाठी बालकाच्या किमान वयाबाबत शिक्षण विभागाने निश्चित केलेल्या तरतूदीचे पालन करणे आवश्यक आहे.

८. नामांकित इंग्रजी शाळेत अनुसूचित जमातीचे विद्यार्थ्यांची प्रवेश प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर प्रत्यक्षात प्रवेशित विद्यार्थी संख्येच्या प्रमाणात ऑनलाईन प्रणालीवर तयार होणाऱ्या देयकानुसार आयुक्त, आदिवासी विकास यांनी संबंधित शाळेस थेट ऑनलाईन प्रणालीमार्फत दोन टप्प्यात निधी वितरीत करावा. संबंधित शाळांना ऑनलाईन प्रणालीवर प्राप्त अंतीम गुणांकनानुसार निश्चित होणाऱ्या देय रकमेनुसार एकूण रकमेच्या ५० टक्के रक्कम प्रथम सत्राच्या सुरूवातीस माहे जुलैमध्ये वितरीत करण्यात यावी व उर्वरित ५० टक्के रक्कम दुसऱ्या सत्राच्या सुरूवातीला विद्यार्थ्यांच्या उपस्थितीबाबत खातरजमा करून माहे डिसेंबरमध्ये वितरीत करण्यात यावे.

९. सदर योजनेची अंमलबजावणी संबंधित प्रकल्प अधिकारी करतील तसेच अपर आयुक्त, आदिवासी विकास योजनेचे "पर्यवेक्षकीय अधिकारी" म्हणून व आयुक्त, आदिवासी विकास नाशिक हे "नियंत्रक अधिकारी" म्हणून जबाबदारी पार पाडतील.

१०. सदर योजनेसाठी होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

" मागणी क्र. टी- ५
२२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण-
पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना-जनजाती क्षेत्र उपयोजना-
०२- अनुसूचित जमातीचे कल्याण
७९६,जनजाती क्षेत्र उपयोजना- राज्य योजनांतर्गत योजना
(०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना
(०२) (२९)- अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण देणे.
(२२२५ सी-९९९) ३१ " सहायक अनुदाने (वेतनेतर) "

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२४१६४२५२२३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subrao
Narayan
Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2018.08.24 16:45:53 +05'30'

**( सु.ना.शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.

३) मा.मंत्री, (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
४) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
५) अपर मुख्य सचिव, (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, (शालेय शिक्षण विभाग) यांचे स्वीय सहाय्यक.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर
८) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
९) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/अमरावती/ठाणे.
१०) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
११) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१३) सर्व संबंधित संस्था/शाळा. (संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत)
१४) निवड नस्ती का-१२.